मागणी क्रमांक एस-०४, ४२१० १६२९ (५२ यंत्रसामुग्री व साधनसामुग्री) लेखाशिर्षांतर्गत सन-२०२३-२०२४ या आर्थिक वर्षात वितरीत रक्कम सीईटी सेलच्या बँक खात्यात वर्ग करण्यास मान्यता देण्याबाबत.

---

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,**
शासन निर्णय, क्रमांक : निधीआ-२०२४/प्र.क्र.३३/प्रशा-१,
गोकुलदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन गो.ते.संकुल,
९ वा मजला, मंत्रालय, मुंबई -४०० ००१
दिनांक : ३१ मार्च, २०२४

**शासन निर्णय :-**

सन-२०२३-२४ या आर्थिक वर्षाचा अल्प कालावधी पाहता चालू वर्षासाठी मुख्य लेखाशिर्ष मागणी क्रमांक एस-०४, ४२१० १६२९ (५२ यंत्रसामुग्री व साधनसामुग्री) या अंतर्गत उपलब्ध झालेला निधी वैद्यकीय शिक्षण व संशोधन, संचालनालयातील सीईटी सेलच्या बँक खात्यामध्ये पुढील ६ महिन्यांच्या कालावधीसाठी संक्षिप्त देयकांवर आहरीत करुन वर्ग करण्यास, सर्व तपशीलवार देयके सहा महिन्याच्या आत सादर करण्याच्या अटीवर, एक विशेष बाब म्हणून या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. या निधीबावत स्वतंत्र लेखे ठेवण्यात यावे.

२. तसेच यापूर्वी विविध स्त्रोताद्वारे उक्त प्रयोजनासाठी प्राप्त झालेला निधी पूर्वीची तपशीलवार देयके प्रलंबित असताना संक्षिप्त देयकावर आहरित करुन संचालनालयातील सीईटी सेलच्या बँक खात्यामध्ये वर्ग करण्यासही एक विशेष बाब म्हणून मान्यता देण्यात येत आहे. यासाठी संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई यांना "नियंत्रण अधिकारी" व प्रशासकीय अधिकारी, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणुन घोषित करण्यात येत आहे. उक्त बाबींच्या खरेदीसाठी संक्षिप्त देयकावर आहरित केलेल्या निधीची तपशिलवार देयके संबंधित आहरण व संवितरण अधिकारी सादर करतील.

२. सदर शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.८९/कोषा-५, दिनांक ३०.०३.२०२४ व अनौ सं.क्र.१५७/२०२४/विनियम, दिनांक ३१/०३/२०२४ अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३३११९१२५२०७१३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUDHIR JAYA SHETTY

Digitally signed by SUDHIR JAYA SHETTY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E9D37D499A521B728AEB3DC8EC38B759420308B9FD7816002B4AF0FFBF1111D7, cn=SUDHIR JAYA SHETTY
Date: 2024.03.31 21:35:48 +05'30'

**(सुधीर जया शेट्टी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) महालेखाकार-१/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र मुंबई / नागपूर
२) प्रधान सचिव (ले व को), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
३) सह सचिव/उप सचिववित्त विभाग (५-कोषा/विनियम/९-अर्थ/१३-व्यय) , मंत्रालय, मुंबई
४) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई
५) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई
६) सर्व अधिष्ठाता शासकीय वैद्यकीय /दंत महाविद्यालय व रुग्णालय
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८) निवासी लेखा अधिकारी, मुंबई
९) सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
१०) अवर सचिव (विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
११) निवडनस्ती (प्रशा-१)